**महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकरिता पोलीसांच्या निवासी इमारतींचे बांधकाम करण्यासाठी लेखाशिर्ष ४०७००१५१, ५३- मोठी बांधकामे मधून चालू आर्थिक वर्षात अनुदान वितरित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बांधका-०२२५/प्र.क्र. ६५/पोल-७**

दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २९ मार्च, २०२५

**वाचा :-**

**अपर पोलीस महासंचालक (नि व स), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांकः** पोमसं/२७/सुधारित अंदाजपत्रक /सन २०२४-२५/४८/२०२४, दिनांक ११ फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिकारक्षेत्रातील महाराष्ट्र राज्यातील पोलीसांच्या सेवा निवासस्थानांच्या बांधकामासाठी "गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००), इतर खर्च, (००) (००) (०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणासाठी बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००१५१), ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत सुधारित अंदाजाद्वारे रक्कम रुपये ८३९, ५२, ६०, ०००/- (अक्षरी रुपये आठशे एकोणचाळीस कोटी बावन्न लक्ष साठ हजार) तरतूद करण्यात आली आहे.

त्यास अनुसरुन पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाने संदर्भाधीन दिनांक ११ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या पत्रान्वये पोलीस गृहनिर्माण महामंडळ कार्यालय तसेच इतर पोलीस घटक कार्यालये यांच्या मागणीनुसार पोलीस निवासस्थानांचे बांधकाम करण्यासाठी अंदाजपत्रकीय रक्कम लेखाशिर्ष ४०७००१५१, ५३- मोठी बांधकामे या

लेखाशिर्षामधून प्राधान्याने मंजूर करुन अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर वितरित करण्याची विनंती शासनास केली आहे.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने निधी वितरणाचा प्रस्ताव नियोजन तसेच वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यानुसार नियोजन व वित्त विभागाने प्रस्तुत लेखाशिर्षांतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत रक्कम रुपये ८२८,१६,००,०००/- एवढा निधी वितरित करण्यास मान्यता दिली आहे. नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने सदर निधी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस गृहनिर्माण महामंडळ कार्यालय व इतर पोलीस घटक कार्यालये यांच्या पोलीस निवासस्थानांच्या बांधकामासाठी "गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००), इतर खर्च, (००) (००) (०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणासाठी बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००१५१), ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत रक्कम रुपये ८२८,१६,००,०००/- (अक्षरी रुपये आठशे अठ्ठावीस कोटी सोळा लक्ष फक्त) हा पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत आहे. सदर निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणलीवर (BDS) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयास उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

वरीलप्रमाणे वितरित करण्यात आलेला निधी "गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (८००), इतर खर्च, (००) (००) (०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणासाठी बांधकाम करणे (कार्यक्रम) (४०७००१५१), ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षामधून खर्ची घालून चालू आर्थिक वर्ष सन २०२४-२५ मधील अनुदानामधून भागविण्यात यावा.

वरील निधी अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करण्यासाठी "पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई" यांना "नियंत्रण अधिकारी" तर त्यांच्या अधिनस्त असलेल्या आहरण व संवितरण अधिकारी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाचा अनौ. संदर्भ क्रमांक ७४/का. १४६१, दिनांक १३/०२/२०२५ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्रमांक १४२/२०२५/व्यय-७, दिनांक २७/०३/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१७५३५५४६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.03.29 17:55:02 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीस संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., वरळी, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (कार्यासन पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.)